**बंधपत्रित सेवेची व्याप्ती वाढविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्र.एमईडी १०१७/प्र.क्र.४५५/१७/शिक्षण-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
९ वा मजला, नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
**दिनांक:- १२ जून,२०१८**

**वाचा :-**
१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन पत्र क्र.एमईडी १०१४/प्र.क्र.२८५/१४/शिक्षण-२, दिनांक ०७/११/२०१५
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन पत्र क्र.एमईडी १०१४/प्र.क्र.२८५/१४/शिक्षण-२, दिनांक १६/०६/२०१६
३) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र.एमईडी १०१७/प्र.क्र.१७१/१७/शिक्षण-२, दिनांक १२/१०/२०१७
४) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.एमईडी १०१७/प्र.क्र.१७१/१७/शिक्षण-२,दि. २४/११/२०१७
५) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन परिपत्रक क्र.एमएमसी ०८१६/ प्र.क्र.३३/ अधिनियम, दिनांक ०५/०१/२०१७

**प्रस्तावना:-**राज्यातील शासकीय आणि महानगरपालिकेच्या वैद्यकीय/दंत महाविद्यालयातून पदवी, पदव्युत्तर पदविका, पदव्युत्तर पदवी व अतिविशेषोपचार अभ्यासक्रम पूर्ण करणाऱ्या उमेदवारांना बंधपत्रित सेवेबाबत सुधारित अटी लागू करुन शैक्षणिक वर्ष २०१९-२० मधील पदव्युत्तर अथवा अतिविशेषोपचार अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी इच्छुक उमेदवारांनी प्रवेशापूर्वी बंधपत्रित सेवा पूर्ण करणे आवश्यक राहिल अशी अट संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ वरील शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आली आहे. तसेच, बंधपत्रित सेवा पूर्ण केली असण्याची अट महाराष्ट्र वैद्यक परिषदेमार्फत पदवीचे नुतनीकरण करण्यासाठी आवश्यक केली आहे. त्यानुषंगाने बंधपत्रित सेवा करण्यासाठी शासकीय आणि महानगरपालिकेच्या वैद्यकीय/दंत महाविद्यालयांमध्ये बंधपत्रित उमेदवारांकडून विचारणा होत आहे. त्याचप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आरोग्य सेवा बळकटीकरणाच्या अनुषंगाने मनुष्यबळ उपलब्ध होण्यासाठी सदर अभियानांतर्गत निर्माण केलेल्या पदांवरील कंत्राटी वैद्यकीय सेवा ही बंधपत्रित सेवा म्हणून ग्राहय धरण्याची विनंती सार्वजनिक आरोग्य विभागाने केली आहे. यापूर्वी संदर्भ क्रमांक १ व २ वरील शासन पत्रान्वये वरिष्ठ निवासी व कनिष्ठ निवासी (अनोंदणीकृत) यांच्या सेवा बंधपत्रित सेवा म्हणून ग्राहय धरण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. आता, रुग्णालयातील प्रबंधक

(रजिस्ट्रार), कनिष्ठ निवासी-१/२/३, टयुटर, हाऊसमन या अशैक्षणिक पदावरील सेवा आणि राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत केलेली कंत्राटी सेवा ही बंधपत्रित सेवा म्हणून ग्राहय धरण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील शासकीय अथवा स्थानिक स्वराज्य संस्थेच्या अखत्यारितील रुग्णालयांतील आणि राज्यामध्ये स्थित केंद्र शासनाची अथवा केंद्र शासनाच्या उपक्रमांतर्गत रुग्णालयांतील कनिष्ठ निवासी-१/२/३, हाऊसमन, प्रबंधक (रजिस्ट्रार), टयुटर या पदांवर केलेली वैद्यकीय सेवा, त्याचप्रमाणे राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्यातील पूर्णवेळ कंत्राटी पदांवर केलेली वैद्यकीय सेवा ही बंधपत्रित सेवा म्हणून ग्राहय धरण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निर्णय हा पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१११८४०३२७५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surendra Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, serialNumber=f0abc250c4d9be2b6b786fa7056a78c0298ba36e78a4582723738fdd3d550d44, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2018.06.13 13:23:35 +05'30'

**(सुरेन्द्र चानकर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (वैसेवा/प्रशासन), वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये (बृहन्मुंबई महानगरपालिका)
अधिष्ठाता, सर्व शासकीय वैद्यकीय/ दंत महाविद्यालये,
अधिष्ठाता, सर्व महानगरपालिका वैद्यकीय/ दंत महाविद्यालये,
निवडनस्ती (शिक्षण-२)